**राज्यात संपूर्ण स्वच्छता अभियानास गती देण्यासाठी**
**'निर्मल स्व-राज्य मोहिम' राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्र.संस्वअ-२०११/प्र.क्र. ४३ /पा.पु.१६.**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दि. १५ फेब्रुवारी २०११**

वाचा: १) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.घभाभ-क्र.१००५/प्र.क्र.४६३/पापु-१६ दिनांक.०८ जुन, २००६
२) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.निर्मल-२००८/प्र.क्र.७२/पापु-१६ दिनांक. २५ मार्च, २००८.
३) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.संस्वअ-१००९/प्र.क्र.१९७/पापु-१६ दिनांक. २३ फेब्रुवारी, २०१०.

**प्रस्तावना :**

देशात स्वच्छेतेची लोक चळवळ निर्माण करण्यासाठी केंद्र शासन पुरस्कृत मागणी आधारीत व लोकसहभागाच्या तत्वावर संपूर्ण स्वच्छता अभियान, राज्यातील ३३ जिल्ह्यात राबविण्यात येत आहे. राज्याची स्वच्छतेची व्याप्ती सन २००० साली १९% होती ती आता ६५% पर्यंत पोहचली आहे. महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवानिमित्त राज्यात स्वच्छतेची व्याप्ती वाढविण्यासाठी मोठ्याप्रमाणात जनजागृती करण्यात येत आहे. निर्मल महाराष्ट्राचे स्वप्न साकार करण्यासाठी राज्यातील ही स्वच्छतेची लोकचळवळ अधिक बळकट होणे आवश्यक आहे. या दृष्टिकोनातून राज्यामध्ये स्वच्छतेची विशेष मोहिम हाती घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

संपूर्ण महाराष्ट्र राज्य निर्मल करण्यासाठी राज्यात स्वच्छतेची लोकचळवळ बळकट करणे आवश्यक आहे. यासाठी दि. १९ फेब्रुवारी, २०११ रोजी छत्रपती शिवाजी महाराज यांची जयंती, दिनांक २३ फेब्रुवारी २०११ रोजी संत गाडगेबाबा यांची जयंती, दिनांक ८ मार्च २०११ रोजी जागतिक महिला दिन, दिनांक २२ मार्च २०११ रोजी जागतिक जलदिन व दिनांक ७ एप्रिल २०११ रोजी जागतिक आरोग्य दिन या दिनविशेषांचे औचित्य साधून, यावर्षासाठी दिनांक १९ फेब्रुवारी २०११ पासून राज्यात *'निर्मल स्व-राज्य मोहिम'* राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या मोहिमेचा समारोप दिनांक. १४ एप्रिल, २०११ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जयंतीदिनी करण्यात येईल.

**मोहिमेची उद्दिष्ट्ये**

१. स्वच्छतेची व्याप्ती ६०% पेक्षा कमी असलेल्या ग्रामपंचायतीमध्ये वैयक्तिक शौचालयांची वाढ करुन प्रत्येक तालुक्यातील किमान ३० ग्रामपंचायतींची निवड करुन १००% हागणदारीमुक्त करणे व या व्यतिरिक्त तालुक्यातील सर्व ग्रामपंचायतीची स्वच्छतेची व्याप्ती किमान ६५% पर्यंत आणणे.

३. सर्व प्राथमिक शाळा व अंगणवाडयांमध्ये स्वच्छतागृहांची सुविधा उपलब्ध करुन देणे, सर्व माध्यमिक शाळा, आश्रमशाळा व शासकीय कार्यालयामध्ये स्वच्छतागृहांची सुविधा उपलब्ध असण्याची खात्री करणे.
४. वार्षिक अंमलबजावणी आराखडयानुसार (AIP) भौतिक व आर्थिक उद्दिष्टये दि. ३१ मार्च, २०११ पर्यंत १००% साध्य करणे.
५. सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापन याबाबत जागृती निर्माण करणे.

**मोहीमेची अंमलबजावणी**

१. **ग्रामपंचायत निवडीचे निकष :** स्वच्छतेची व्याप्ती ६०% पेक्षा कमी असलेल्या ग्रामपंचायतींची निवड या मोहिमेसाठी करण्यात यावी. त्यानुसार प्रत्येक तालुक्यातील किमान ३० ग्रामपंचायतीची निवड करावी. ६०% पेक्षा कमी स्वच्छतेची व्याप्ती असलेल्या ग्रामपंचायतींची संख्या ३० पेक्षा कमी असल्यास इतर ग्रामपंचायतींचा यामध्ये समावेश करण्यात यावा.

२. **मोहिमेचा शुभारंभ -** दि. १९ फेब्रुवारी २०११ रोजी छत्रपती शिवाजी महाराज यांच्या जयंतीचे औचित्य साधून जिल्हास्तरावर जिल्हा परिषदेचे अध्यक्ष यांच्या शुभहस्ते व जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा पोलिस अधिक्षक, जिल्हा परिषदेचे पदाधिकारी, अधिकारी व कर्मचारी यांच्या उपस्थितीत मोहिमेचा शुभारंभ करावा. याचप्रमाणे तालुका स्तरावर पंचायत समितीचे सभापती यांच्या हस्ते पंचायत समितीचे पदाधिकारी, गट विकास अधिकारी, अधिकारी व कर्मचारी यांच्या उपस्थितीत कार्यक्रम घ्यावा. जिल्ह्यात रथयात्रा/सायकल रॅली/ मानवी साखळी/कलापथक इत्यादी उपक्रमाचे आयोजन करावे, जेणेकरुन परिणामकारक व उत्साहावर्धक वातावरणात मोहिमेचा शुभारंभ होईल. जिल्हा परिषद अध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पत्रकार परिषद घेऊन मोहिम जाहीर करावी.

३. **जिल्हा स्तरीय निर्मल मेळावा:** दि. २३ फेब्रुवारी २०११ रोजी संत गाडगेबाबा यांच्या जयंतीदिनी या मोहिमेअंतर्गत जिल्ह्यातील निवड केलेल्या ग्रामपंचायतीचे सर्व सरपंच व ग्रामसेवक तसेच नवनिर्वाचित सरपंच यांचा निर्मल मेळावा जिल्हास्तरावर आयोजित करण्यात यावा. या मेळाव्यास जिल्ह्यातील खासदार, आमदार, जिल्हा परिषद व पंचायत समित्यांचे सर्व पदाधिकारी, सदस्य व लोकप्रतिनिधी यांना निमंत्रित करावे. मेळाव्यामध्ये सर्व सरपंचाना गाव निर्मल करण्याचे आवाहन करुन त्यांना स्वच्छतेची शपथ देण्यात यावी. यावेळी स्वच्छता प्रदर्शनी, स्वच्छता पार्क इत्यादीचे आयोजन करावे.

४. **विशेष दिन साजरे करणे:** सदर मोहिम काळात दि.०८ मार्च जागतिक महिला दिन, दि. २२ मार्च जागतिक जल दिन व ७ एप्रिल हा जागतिक आरोग्य दिन येत असुन सदर दिनाचे औचित्य साधून जिल्हा, तालुका व ग्रामस्तरावर स्वच्छतेविषयक विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

५. जिल्ह्यातील सर्व शासकीय कार्यालयांमध्ये कर्मचारी व अभ्यागतांसाठी स्वच्छतागृहाची सुविधा उपलब्ध करण्यासंदर्भात शासन परिपत्रक क्र क्र.संस्वअ-१००९/प्र.क्र.१९७/पापु-१६ दिनांक. २३ फ़ेब्रुवारी, २०१०. अन्वये जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षेतेखाली नेमण्यात आलेल्या समितीची मोहिम कालावधीत पहिल्या आठवड्यात बैठक आयोजित करुन जिल्ह्यातील सर्व शासकीय कार्यालयामध्ये स्वच्छतागृहाची सुविधा उपलब्धता व आवश्यकते नुसार स्वच्छतागृहांची दुरुस्ती करण्याबाबत विभागांना सूचना देण्यांत याव्यात.

६. **कर्मचाऱ्यांकडे शौचालयांची उपलब्धता** : राज्यातील सर्व शासकीय कर्मचा-याकडे शौचलयाची सुविधा संदर्भिय शासन निर्णय क्र.घभाभ-क्र.१००५/प्र.क्र.४६३/पापु-१६ दि.०८ जुन, २००६ अन्वये बंधनकारक आहे. यानुसार मोहिम कालावधीत जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी व जिल्हा पोलिस अधिक्षक यांची संयुक्त बैठक घेऊन शौचालयाची सुविधा नसलेल्या कर्मचा-यांचा आढावा घेण्यात यावा व शौचालय नसलेल्या कर्मचा-यांना प्रवृत्त करुन सर्व शासकीय कर्मचा-याकडे शौचालयाची सुविधा करुन घेण्याची सुचना करावी. मोहिम कालावधीत शौचालय न बांधलेल्या कर्मचा-याची प्रसिध्दी करण्यात यावी.

७. **पंचायतराज संस्था पदाधिकारी व सदस्य यांच्याकडे शौचालय उपलब्धता** : मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ व जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम १९६१ सुधारणान्वये दिनांक १० एप्रिल २०११ अखेर पंचायतराज संस्थामधील सर्व पदाधिकारी व सदस्याकडे शौचालयाची सुविधा त्यांनी उपलब्ध करुन घेणे आवश्यक आहे. त्यासाठी या मोहीम कालावधीत मोठ्याप्रमाणात जाणीव जागृती करण्यात यावी.

८. **विविध घटकांचा सहभाग**: जिल्हास्तरावर स्वच्छते विषयक मोठयाप्रमाणात उठाव व्हावा यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी राष्ट्रीय सेवा योजना, स्काऊट व गाईड, एन.सी.सी., माजी सैनिक मंडळ, नेहरु युवा केंद्र, किर्तनकार, यांची बैठक घेऊन त्यांचे जाणीव जागृतीसाठी जास्तीत जास्त सहकार्य घ्यावे व काही गांवे त्यांना दत्तक द्यावी. त्याचबरोबर साखर कारखाने, सहकारी सुत गिरण्या, सहकारी दुध संघ, पत्रकार संघ, स्वयंसेवी संस्था, लायन्स क्लब, रोटरी क्लब यांच्या पदाधिकाऱ्यांची बैठक घेऊन त्यांना गावे दत्तक देण्यात यावीत. तसेच सहकार क्षेत्रातील कर्मचाऱ्यांना शौचालय बांधणे बंधनकारक करण्यासाठी त्यांना प्रेरित करावे.

९. **शालेय स्वच्छता व आरोग्य शिक्षण**: मोहीम कालावधीत जिल्ह्यातील सर्व प्राथमिक शाळा मध्ये मुलामुलींसाठी स्वतंत्र स्वच्छतागृहाची सोय करण्यात यावी. तसेच अंगणवाड्यामध्ये बालसुलभ स्वच्छतागृहाची सुविधा उपलब्ध करुन देण्यात यावी. जिल्ह्यातील सर्व शासकीय, अनुदानित व विना अनुदानित माध्यमिक व आश्रमशाळांमध्ये मुला-मुलीसाठी स्वतंत्र स्वच्छतागृहाची सुविधा उपलब्ध असेल याची खात्री करावी तसेच आवश्यकतेनुसार दुरुस्ती करण्यात यावी.

**१०.निवडलेल्या गावात निर्मल कृतीदलाचे गठन:** मोहिम कालावधीत निवडलेल्या प्रत्येक गावात किमान १० उत्साही व कष्टाळू कार्यकर्त्यांचे निर्मल कृतीदल ग्रामपंचायतीच्या मार्गदर्शनाखाली तयार करण्यात यावे. यात पाणी पुरवठा स्वच्छता समितीचे अध्यक्ष, महात्मा गांधी तंटामुक्त गावसमिती अध्यक्ष, ग्राम शिक्षण व्यवस्थापन समिती अध्यक्ष, ओपिनियन लिडर, युवक, महिला प्रतिनिधी, महिला स्वंय सहाय्यता गट प्रतिनिधी, अंगणवाडी सेविका, महिला मंडळ प्रतिनिधी इत्यादींचा सहभाग असावा. कृती दलाने गृहभेटी, गट चर्चा, कोपरा बैठका, मशाल फ़ेरी, गावसभा इत्यादीचे आयोजन करुन ग्रामस्थांना शौचालय बांधकामासाठी प्रवृत्त करावे.

**११.ग्रामपंचायती दत्तक देणे:** मोहिम कालावधीमध्ये निवडलेल्या ग्रामपंचायती निर्मल करण्यासाठी जिल्हा परिषद व पंचायत समित्यांचे पदाधिकारी व सदस्य यांचा सहभाग घेण्यासाठी एक पदाधिकारी / सदस्य तसेच त्यांच्या सोबत एक अधिकारी / कर्मचारी यांना संयुक्तपणे एक ग्रामपंचायत दत्तक देण्यात यावी. मोहिम कालावधीत पदाधिकारी व अधिकारी/कर्मचारी यांनी दत्तक घेतलेल्या ग्रामपंचायतींना नियमित भेटी देऊन कामास गती देण्यासाठी ग्रामस्थांना प्रोत्साहीत करावे.

**१२.वैयक्तिक शौचालय बांधकाम मोहिम:** मोहिम कालावधीत निवडलेल्या सर्व ग्रामपंचायतीमध्ये शौचालय नसलेल्या सर्व कुटुंबाकडे शौचालयाची सुविधा निर्माण करण्यासाठी त्या कुटुंबांना प्रेरीत करण्यात यावे. बांधकामासाठी आवश्यक प्रशिक्षित गवंडी उपलब्ध करुन देण्यात यावेत तसेच आवश्यकतेनुसार गवंडी प्रशिक्षणाचे आयोजन करण्यात यावे. शौचालय बांधकामासाठी आवश्यक साहित्य सहज उपलब्ध होईल यासाठी प्रत्येक तालुक्यात दोन स्वच्छता साहित्य विक्री केंद्र असावीत. वैयक्तिक शौचालय बांधकाम मोहिम दिनांक २४ फ़ेब्रुवारी ते १४ एप्रिल २०११ या कालवधीत धेऊन त्या कालावधीत गावे १०० टक्के निर्मल होतील याची खात्री करण्यात यावी.

**१३.नाविन्यपूर्ण उपक्रम:** वर नमुद केलेल्या उपक्रमांव्यतिरिक्त स्वच्छतेची व्याप्ती वाढविण्यासाठी जिल्हा स्तरावर व ग्रामस्तरावर नाविन्यपूर्ण उपक्रम हाती घेण्यात यावेत.

**१४.मोहिम कालवधीत जाणीव जागृती कार्यक्रम :** मोहिम कालवधीत जिल्हा परिषद व पंचायत समिती परिसरामध्ये मोहिमेचे उद्दिष्ट स्पष्ट करणारे होर्डिंग व पंचायतराज पदाधिकारी व सदस्यांना शौचालय बंधनकारक असल्याबाबतची जागृती करणारे होर्डिंग/फ्लेक्स याप्रमाणे किमान दोन होर्डिंग्ज/फ्लेक्स लावण्यात यावेत. प्रसार माध्यमांचा उपयोग करुन स्वच्छतेविषयक मोठयाप्रमाणात प्रचार व प्रसिध्दी करण्यात यावी. जिल्हा परिषद अध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या संयुक्त स्वाक्षरीचे, शौचालय बांधकाम करण्याबाबतचे आवाहन पत्र जिल्ह्यातील सर्व पंचायत राज पदाधिकारी व सदस्य यांना देण्यात यावे

मोहिम कालावधीत तालुकास्तरावरुन मोठ्याप्रमाणात जनजागृती व्हावी यासाठी प्रत्येक पंचायत समितीस्तरावर एक स्वच्छता रथ तयार करण्यात यावा त्यासाठी एक वाहन भाड्याने घेऊन

ते स्वच्छतेच्या संदेशाने रंगविण्यात यावे व त्यावर लाऊडस्पिकर बसविण्यात यावा. जिल्ह्यातील सर्व तालुक्याचे स्वच्छता रथाचे दिनांक २३ फ़ेब्रुवारी रोजी जिल्हास्तरावरील मेळाव्याच्या ठिकाणी प्रदर्शन भरविण्यात यावे. जिल्हा परिषद अध्यक्षांच्या हस्ते रथ यात्रेचा शुभारंभ करण्यात यावा व सदर रथ संबंधीत तालुक्यात सर्वत्र फ़िरुन जनजागृती करील याचे नियोजन तालुकास्तरावरुन करण्यात यावे.

मोहिम कालावधी मध्ये निवडलेल्या सर्व ग्रामपंचायतींमध्ये कलापथक व स्वच्छतेविषयक माहिती पटाचे प्रदर्शन व उपलब्ध माध्यमांचा वापर करुन स्वच्छतेविषयक जनजागृती जागृती करण्यात यावी.

१५. **संकल्प दिवस:** दिनांक १४ एप्रिल २०११ रोजी डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या जयंतीचे अवचित्य साधून मोहिमेतंर्गत निवडलेल्या ग्रामपंचायतींचे सरपंच, ग्रामसेवक तसेच कृतीदलातील सदस्य यांच्या कार्यशाळेचे तालुकास्तरावर आयोजन करुन संकल्प दिवस साजरा करावा. यामध्ये गावात शाश्वत स्वच्छता राखण्याबाबत संकल्प करण्यात यावा.

**उत्कृष्ट काम करणाऱ्या ग्रामपंचायत व जिल्ह्यांचा गौरव:**

- मोहिमेतंर्गत. निवडलेल्या ग्रामपंचायती पैकी ज्या ग्रामपंचायती मोहिम कालावधीत १०० टक्के हागणदारीमुक्त होतील त्या ग्रामपंचायतीचा गौरव दिनांक १ मे २०११ रोजी महाराष्ट्र दिनाचे औचित्य साधून जिल्ह्याचे पालकमंत्री यांच्या हस्ते गौरवपत्र व स्मृतीचिन्ह देऊन करण्यात यावा.
- मोहिम कालावधीत नाविन्यपूर्ण उपक्रम (उदा, विविध नेटवर्कचा वापर, माहिती शिक्षण व संवाद विषयक नवीन संदेश बनविणे, साहित्य निर्मिती इ.) राबविणाऱ्या व सर्वात जास्त वैयक्तिक शौचालयाचे बांधकाम करणाऱ्या प्रथम तीन जिल्ह्याचा गौरव राज्यस्तरीय कार्यक्रमात करण्यात येईल, यासाठी राज्यस्तरावर जिल्ह्यांचे सादरीकरण आयोजित केले जाईल.

**निधीची उपलब्धता :**

सदर मोहिमे अंतर्गत समाविष्ट केलेल्या विविध उपक्रमांसाठी आवश्यक असणारा खर्च हा संपूर्ण स्वच्छता अभियानाच्या माहिती शिक्षण व संवाद या शिर्षा मधून शासनाने निश्चित केलेल्या विहित पध्दतीने करण्यात यावा.

**मोहिमेचे सनियंत्रण:**

मोहिमेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी तालुकास्तरावर गट विकास अधिकारी यांच्या नियंत्रणाखाली एका समन्वयक अधिका-याची निवड करावी. तालुक्यातील उपक्रमाचे संनियंत्रण व जिल्ह्याशी समन्वय राखण्याची जबाबदारी त्यांना देण्यात यावी. निवडलेल्या प्रत्येक गावासाठी गटविकास अधिकारी यांनी

प्रत्येकी १ याप्रमाणे संपर्क अधिका-याची निवड करावी. दर पंधरा दिवसानी तालुका व जिल्हास्तरावर आढावा घेण्यात यावा. विभागीय आयुक्त यांनी विभागातील जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या संयुक्त आढावा सभेत कामाचा आढावा घ्यावा. राज्यस्तरावरुन या मोहिमेचा आढावा नियमित घेतला जाईल.

वरील कालवधीत राबविण्यात येत असलेल्या मोहिमेच्या माध्यमातून राज्याची स्वच्छतेची व्याप्ती वाढून निर्मल महाराष्ट्राचे स्वप्न साकार होण्यास मदत होईल यासाठी या मोहिमेची प्रभावी अंलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक हे www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक 201102211606591001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्राजक्ता लवंगारे-वर्मा)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मंबई यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मंबई यांचे खाजगी सचिव
३) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मंबई
५) सचिव, ग्रामविकास, मंत्रालय, मंबई
६) विभागीय आयुक्त,(सर्व)
७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मंबई
८) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, (सर्व)
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१०) उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
११) राज्य समन्वयक, संवाद व क्षमता विकास कक्ष, बेलापुर, नवी मुंबई.
१२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती, पापु-१६.